**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः उसप-१३२२/प्र.क्र.१०९/का.१४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १६ फेब्रुवारी, २०२३.

**आदेश**

श्रीमती जयरेखा निकुंभ यांची उप सचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक या पदावरील प्रतिनियुक्ती संपुष्टात आणून यांची सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १२-अ च्या अधिपत्याखालील संचालक, नाशिक विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक या पदावर खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रथमत: २ वर्ष कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) श्रीमती जयरेखा निकुंभ, उप सचिव हे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल त्यानंतर २ वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करून त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रूजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला /सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी ३ महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-दोन) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती विचारात घेऊन, प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग व सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १२-अ यांनी आपापसात सल्लामसलत करून ठरवाव्यात.

३. श्रीमती जयरेखा निकुंभ, उप सचिव यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १२-अ यांच्यामार्फत हाताळण्यात येतील.

४. श्रीमती जयरेखा निकुंभ, उप सचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक यांना सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १२-अ च्या अधिपत्याखालील संचालक, नाशिक विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक या पदावर रूजू होण्यासाठी राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच नाशिक विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक यांनी श्रीमती जयरेखा निकुंभ, उप सचिव यांना तात्काळ रूजू करून घ्यावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०२१६१८३१०४२४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.02.16 18:35:13 +05'30'

**(वि. बा. माने)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४) संचालक, नाशिक विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक
५) आयुक्त,राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक
६) सह सचिव/उप सचिव (आस्थापना), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग/सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२-अ, मंत्रालय, मुंबई-३२
७) श्रीमती जयरेखा निकुंभ, उप सचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक
८) निवड नस्ती कार्या.१४.